**राज्याच्या एका सेवेतून राज्याच्या दुस-या सेवेत दि.१.११.२००५ नंतर रुजु होणा-या कर्मचा-यांना लागु होणा-या निवृत्तीवेतन योजनेबाबत स्पष्टीकरण.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : अंनियो १००९/प्र.क्र.३२/सेवा ४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक :१८ ऑगस्ट,२००९.**

वाचा :१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अंनियो १००६/८७/सेवा ४, दिनांक १२ जानेवारी २००७
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अंनियो १००९/१३/सेवा ४, दिनांक २४ फेब्रुवारी २००९
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अंनियो १००९/३२ /सेवा४, दिनांक १६ जुलै २००९

**परिपत्रक**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : अंनियो १००५/१२६/सेवा ४, दिनांक ३१ ऑक्टोबर २००५ अन्वये राज्य शासनाच्या सेवेत १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांसाठी नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना" लागू करण्यात आली आहे. या योजनेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात आलेली संदर्भाधिन क्र.२ व ३ची अनुक्रमे दि.२४.२.२००९ व १६.७.२००९ची परिपत्रके रद्द करण्यात येत आहेत.

२. वरील योजनेसंदर्भात शासन आणखी असा खुलासा करीत आहे की, दि. १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अंनियो १००६/८७/सेवा ४, दिनांक १२ जानेवारी २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. या परिपत्रकात नमूद केलेल्या (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचाऱ्यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना लागू ठरेल.

३. वरील स्पष्टीकरण जिल्हा परिषदा तसेच ज्यांना सध्या अस्तित्वात असलेली निवृत्तिवेतन योजना व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी लागू आहे, अशा मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे आणि त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे इत्यादींच्या सेवेमध्ये दि. १.११.२००५रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी, *योग्य त्या फेरफारांसह,* लागू ठरेल.

४. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २००९०८१८१७१७५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**निलेश बा.वाडेकर**
**शासनाचे उप सचिव**

प्रति,
प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती)
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (प्रत्येकी ५ प्रती)
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (२५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (५० प्रती),
मुख्य लेखापरीक्षा, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन,
वाशी, नवी मुंबई (१० प्रती)
उपमुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,
मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती (प्रत्येकी १० प्रती)
वरिष्ठ कोषा अधिकारी, पुणे / नागपूर/ औरंगाबाद/
नाशिक (प्रत्येकी १५ प्रती)
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती)
सर्व कोषागार अधिकारी
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
*प्रबंधक मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
*प्रबंधक अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ, सचिवालय, मुंबई.
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४,
अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय आवार, मंत्रालय समोर, मुंबई
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय ग्रंथालय,
मंत्रालयातील सर्व विभाग
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व
कार्यासनांचे प्रमुख.
सर्व विभागीय आयुक्त, (प्रत्येकी ५ प्रती)
सर्व जिल्हाधिकारी.
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती)
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक, (प्रत्येकी ३ प्रती)
सर्व विभागीय तंत्रशिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती)

शिक्षण निरिक्षक बृहन्मुंबई, दक्षिण / उत्तर / पश्चिम

सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती)

सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती)
सर्व जिल्ह्यांचे वरिष्ठ लेखापरिक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती).
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जि.अहमदनगर (१० प्रती)
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी (१० प्रती)
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती)
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि.रत्नागिरी (१० प्रती)
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती)
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती)
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती)
कृषि व पशुसंवर्धन व दुग्ध व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती)
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवडनस्ती (सेवा-४)

----------------------
*पत्राद्वारे